**ॲड.आशिष चव्हाण, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत....**
**द.वि.प. पो.ठा. काळाचौकी, मुंबई गु.र.क्र.११/२०१९ या दाखल गुन्हयातून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणामधील कामकाजाकरीता.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-०१२४/प्र.क्र.०६/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १४ मे, २०२५.

**संदर्भ:-**१.पोलीस अधीक्षक (गुप्तवार्ता), द.वि.प. मुंबई यांचे पत्र क्र.९३८/ पो.अधी. (गुप्तवार्ता) / दविप/ म.रा./२०२४, दि.१३.०६.२०२४.
२.शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-२०२४/यू.ओ.आर.४०/डी-१४, दि.१३. ०१. २०२५.
३.शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५.
४.शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

**शासन निर्णय :-**

द.वि.प. पो.ठा. काळाचौकी, मुंबई गु.र.क्र.११/२०१९ या दाखल गुन्ह्यातून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणी शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी ॲड.आशिष चव्हाण यांची विधि व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन क्र.२ येथील शासन अधिसूचनेन्वये "विशेष सरकारी अभियोक्ता" म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी काम पाहण्यासाठी ॲड.आशिष चव्हाण यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**मा.विशेष न्यायालय, मुंबई व मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील कामकाजाकरीता :-**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.३०,०००/- (अक्षरी रुपये तीस हजार फक्त)
आ) विचारविनिमय प्रतितास फी - रु.५,०००/- (अक्षरी रुपये पाच हजार फक्त)

उपरोक्त नमूद फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड.आशिष चव्हाण यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फी चे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा.न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधीक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या **"मागणी क्रमांक बी-१, २०५५ पोलीस -(००)१०१, गुन्हा अन्वेषण आणि दक्षता (००)(०५) दहशतवाद विरोधी पथक - (२०५५ ०५७१) (योजनेत्तर/दत्तमत) व्यावसायिक व विशेष सेवा"** या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार आणि संदर्भ क्र. ३ व ४ मधील वित्त विभाग शासन निर्णयानुसार, मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२५०५१४१७३२१६०८३३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MURLIDHAR
MADANRAO MUNDE

Digitally signed by MURLIDHAR MADANRAO MUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=6ce40b982ce0fd403128e2717e7e0c7b7377fd69d7d23790cb110e33b1e0491e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=716527D5A822F9E40134FCE6C6C6B8E1521D5C66E1D2D46A3F04B04DE16DF388, cn=MURLIDHAR MADANRAO MUNDE
Date: 2025.05.14 17:33:18 +05'30'

**( मुरलीधर मुंडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस अधीक्षक (गुप्तवार्ता), दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. विधि व न्याय विभाग (कार्यासन-१४), मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
८. ॲड.आशिष एस.चव्हाण, ऑफिस-२४ बी, राजाबहादूर कंपाऊंड, १२३ ए, ३ रा मजला, अंबालाल दोशी मार्ग, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
९. निवड नस्ती (पोल-१०).